**कोषागारात रोख देय अनुदान**

**आर्थिक वर्ष २००९-१०**

**मागणी क्र.वाय-२, २२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता- जागतिक बँक सहाय्यित जलविज्ञान प्रकल्प -लेखाशीर्ष २२१५ १७६३(केंद्र हिस्सा) व लेखाशीर्ष २२१५ ९०७६ (राज्य हिस्सा) पुर्नविनियोजन व खर्चाचा खातेबदल**

**महाराष्ट्र शासन**

पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,

शासन निर्णय क्र.बीयुडी-४४०९/प्र.क्र. २२९/पापु-१५,

मंत्रालय, मुंबई ४०००३२

दिनांक - **३० मार्च २०१०**

संदर्भ- १.पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, शासन निर्णय, समक्रमांक, दि. ९ नोव्हेंबर, २००९ , दि.२७ जानेवारी २०१० व दि.१२ मार्च २०१०

२.वित्त विभाग,शासन परिपत्रक क्र. पूरक-२०.१०/प्र.क्र.६८/अर्थसंकल्प-३ दिनांक ३० मार्च,२०१०

**प्रस्तावना:-**

सन २००९-१० या आर्थिक वर्षात, जागतिक बँक अर्थसहाय्यित जलविज्ञान कार्यक्रमाकरिता "मागणी क्र.वाय-२,२२१५-पाणी पुरवठा व स्वच्छता, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (०६) जागतिक बँक सहाय्य प्रकल्प -(०६) (१४) जलविज्ञान प्रकल्प-भूजल विषयक कार्यक्रम (२२१५ १७६३)" या लेखाशीर्षाखाली जागतिक बँक अर्थसहाय्यित अनुदान (EAP - केंद्र हिस्सा ) म्हणून रु.१७७.७६ लक्ष आणि राज्य हिश्श्यापोटी (९९९९९९९९ या लेखाशीर्षाखाली) रु.५०.१४ लक्ष असा एकूण रु.२२७.९० लक्ष नियतव्यय मंजूर करण्यात आला होता.

सन २००९-२०१० या आर्थिक वर्षासाठी जागतिक बँक सहाय्यित जलविज्ञान प्रकल्प टप्पा-२ चा खर्च भागविण्यासाठी अर्थसंकल्पीत व मंजूर करण्यात आलेला रुपये २२७.९० लक्ष निधी संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांना उपलब्ध करुन देण्यात आलेला आहे.

नियोजन विभागाने सूचित केल्यानुसार, जलविज्ञान प्रकल्पासाठी राज्य हिश्श्यापोटी तात्पुरत्या दिलेल्या ९९९९९९९९ या लेखाशीर्षाऐवजी "मागणी क्र. वाय-२ २२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता (०६)(१५) जलविज्ञान प्रकल्प, भूजल विषयक कार्यक्रम (२२१५ ९०७६) ५० इतर खर्च (राज्य हिस्सा)" असा नवीन संकेतांक घेण्यात आलेला असून , सदर नवीन संकेतांकांचा समावेश अर्थसंकल्पात केलेला नसल्याने त्यासाठी विधान मंडळाच्या उन्हाळी अधिवेशनात पूरवणी मागणीद्वारे रु.१ हजाराची लाक्षणिक तरतूद करण्यात आली होती. संदर्भ क्र.२ येथील परिपत्रकान्वये पुरवणी विनियोजन विधेयकास मा.राज्यपालांनी संमती दिली असून ते महाराष्ट्र (पुरवणी ) विनियोजन अधिनियम, २०१० (सन २०१० चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक-३) म्हणून महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण, भाग-४ दि.३० मार्च,२०१० मध्ये प्रसिध्द करण्यात आल्याचे वित्त विभागाने कळविले आहे. तसेच, वित्त विभागाने सुधारित अंदाजात जलविज्ञान प्रकल्पासाठी

लेखाशीर्ष २२१५ १७६३ खाली रु.२२७.८९ लक्ष व लेखाशीर्ष २२१५९०७६ खाली रु.०.०१ लक्ष या प्रमाणे एकूण रु.२२७.९० लक्ष तरतूद उपलब्ध करुन दिलेली आहे.

वित्त विभागाने जलविज्ञान प्रकल्पासाठीच्या राज्य हिश्श्यापोटी लेखाशीर्ष २२१५ ९०७६ खाली रु.०.०१ लक्ष लाक्षणिक मागणी मंजूर करताना, " विभागाने पुनर्विनियोजन व खर्चाचे खातेबदल बाब कार्यवाही पूर्ण करण्याची दक्षता घ्यावी " अशा सूचना दिलेल्या आहेत. त्यानुसार जलविज्ञान प्रकल्पासाठी "मागणी क्र. वाय-२ २२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता (०६)(१४) जलविज्ञान प्रकल्प, भूजल विषयक कार्यक्रम (२२१५ १७६३) ५० इतर खर्च (केंद्र हिस्सा)" खाली मंजूर रु.२२७.८९ लक्ष तरतूदीपैकी रु.५०.१३ लक्ष तरतूद "मागणी क्र. वाय-२ २२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता (०६)(१५) जलविज्ञान प्रकल्प, भूजल विषयक कार्यक्रम (२२१५ ९०७६) ५० इतर खर्च (राज्य हिस्सा)" कडे पुनर्विनियोजनाद्वारे वळविण्याची व खर्चाचे खातेबदल करण्याची बाब विचाराधीन आहे.

**<u>शासन निर्णय:-</u>**

प्रस्तावनेत नमूद केल्यानुसार सन २००९-१० या आर्थिक वर्षात सुधारित मंजूर अनुदानानुसार जलविज्ञान प्रकल्प टप्पा-२ वरील खर्च भागविण्यासाठी " मागणी क्र.वाय-२ २२१५- पाणी पुरवठा व स्वच्छता- पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-(०६) जागतिक बँक सहाय्य प्रकल्प -(०६) (१४) जलविज्ञान प्रकल्प-भूजल विषयक कार्यक्रम (२२१५ १७६३) (केंद्र हिस्सा) ५०, इतर खर्च " या लेखाशिर्षाखाली मंजूर रु.२२७.८९ लक्ष तरतूदीपैकी रु.५०.१३ लक्षचे " मागणी क्र.वाय-२ २२१५- पाणी पुरवठा व स्वच्छता- पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- जागतिक बँक सहाय्य प्रकल्प -(०६) (१५) जलविज्ञान प्रकल्प-भूजल विषयक कार्यक्रम (२२१५ ९०७६) (राज्यहिस्सा)" या लेखाशीर्षाकडे पुढील प्रमाणे पुनर्विनियोजन करण्यात येत आहे.

(रु. लक्ष)

| अ क्र | लेखाशीर्ष | सन २००९-१० करिता सुधारीत मंजूर तरतूद | आता पुनर्वितरीत करावयाची तरतूद | पुनर्विनियोजनाद्वारे आता उपलब्ध होणारी तरतूद |
|---|---|---|---|---|
| १. | " मागणी क्र.वाय-२ २२१५- पाणी पुरवठा व स्वच्छता- पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-(०६) जागतिक बँक सहाय्य प्रकल्प -(०६) (१४) जलविज्ञान प्रकल्प-भूजल विषयक कार्यक्रम (२२१५ १७६३) **(केंद्र हिस्सा)** | २२७.८९ | (- )५०.१३ | **१७७.७६** |
| २. | " मागणी क्र.वाय-२ २२१५- पाणी पुरवठा व स्वच्छता- पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-(०६) जागतिक बँक सहाय्य प्रकल्प -(०६) (१५) जलविज्ञान प्रकल्प-भूजल विषयक कार्यक्रम (२२१५ ९०७६) **(राज्य हिस्सा)** | ०.०१ | (+)५०.१३ | **५०.१४** |

२. वित्त विभाग, शासन निर्णय, विअप्र-१०.०८/प्र.क्र. ७०/२००८/विनियम, दिनांक १५ मे,२००९ अन्वये वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८, भाग-एक मधील उपविभाग तीन अनुक्रमांक १ महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका परिच्छेद १६२ ,१६३, व १६४ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार तसेच नियोजन विभागाच्या दि.८/२/२०१० व वित्त विभागाचा अनौ.सं.क्र. ७६/१०/व्यय-३ दि१८/२/२०१० अन्वये मिळालेल्या सहमती नुसार सदर आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharahtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला आहे. त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१००४०९१३२६१६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**(श.वि.दुर्वे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत:

१. संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे
२. उपसंचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, सर्व
३. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई (लेखा परीक्षा /लेखा व अनुज्ञेयता)
४. महालेखापाल, महाराष्ट्र-२ नागपूर (लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता)
५. नियोजन विभाग, का-१४४३, का- १४१४
६. वित्त विभाग, अर्थसंकल्प-१८/२०, व्यय-३ ( २ प्रती)
७. पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील कार्यासने पापु-०४, पापु-०५ पापु-२०
८. पापु-१५ निवड नस्ती